**तालुका स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन**
**समितीवर अशासकीय सदस्यांच्या नेमणुका**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्र.भ्रष्टानि-२००१/प्र.क्र.७/०१/११-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :२८.७.२००३.

संदर्भ : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.भ्रष्टानि-२००१/प्र.क्र.७/११-अ, दिनांक १६.६.२००१.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.भ्रनिस-२००२/प्र.क्र.७/०२/११-अ, दिनांक ५.३.२००३.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.भ्रनिस-२००२/प्र.क्र.७/०२/११-अ, दिनांक १०.१०.२००२.

**परिपत्रक**

विभागीय भ्रष्टाचार निर्मूलन समिती आणि जिल्हा भ्रष्टाचार निर्मूलन समिती यावर अशासकीय सदस्यांच्या गटनिहाय नेमणूका करण्याबाबतच्या सूचना अनुक्रमे दि.५.३.२००३ आणि दि.१६.६.२००१ अन्वये देण्यात आल्या आहेत. तसेच विभागीय, जिल्हा व तालुका स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन समित्यांवर अशासकीय सदस्यांच्या नेमणूकीची सुधारित कार्यपद्धती संदर्भाधिन क्रमांक ३ च्या परिपत्रकान्वये विहित करण्यात आली आहे.

२. उपरोक्त शासन परिपत्रक क्रमांक ३ नुसार तालुका स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन समितीवर अशासकीय सदस्यांची नेमणूक करण्याबाबत सूचित करण्यात आले आहे. तथापि, त्यांची गटनिहाय नियुक्ती कशा प्रकारे करण्यात यावी, याबाबतचे मार्गदर्शन करण्यात आले नव्हते. सबब, याबाबत असे सूचित करण्यात येते की, शासन परिपत्रक क्र.भ्रष्टानि-२००१/प्र.क्र.७/११-अ, दिनांक १६.६.२००१ अन्वये जिल्हा भ्रष्टाचार निर्मूलन समितीसाठी विहित करण्यात आलेल्या गटांनुसारच तालुका भ्रष्टाचार निर्मूलन समितीवर देखील अशासकीय सदस्यांच्या नेमणूका करण्यात याव्यात. तसेच अशा नेमणूका करताना जिल्हा भ्रष्टाचार निर्मूलन समितीवर अशासकीय सदस्यांची नेमणूक करताना ज्याप्रमाणे प्रत्येकी एक सदस्य १) महिला २) अनुसूचित जाती / जमाती ३) विमुक्त व भटक्या जाती/जमाती, आणि ४) इतर मागासवर्गीय या प्रवर्गांमधून निवडले जातात, त्याचप्रमाणे निवडणे आवश्यक राहील. मात्र, कोणत्याही परिस्थितीत अशासकीय सदस्यांची एकूण संख्या १० पेक्षा अधिक रहाणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

३. यासंदर्भातील कार्यपद्धती दिनांक १०.१०.२००२ च्या परिपत्रकात विहित केल्यानुसार राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( भि.रा.वाढवे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
शासनाचे मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व पोलीस आयुक्त / पोलीस अधीक्षक,
सर्व विभागीय आयुक्त/ जिल्हाधिकारी,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सर्व मंत्रालयीन विभाग (या परिपत्रकातील सूचना त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणण्याच्या सुचनेसह)

* पत्राने.